द्वितीय अंक

कवितेच्या जगात साहित्य समूह
नाती जपुया आपुलकीची

काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# सांजवेळ

प्रेम, विरह, आठवण

**- महाराष्ट्राचे साहित्यीक**






"सांजवेळ" या ई-पुस्तक रसिकांच्यासाठी सादर करताना अत्यंत आनंद होत आहे...

महाराष्ट्रातील मान्यवर नवकवी हे विविध प्रकारचे लिखाण करीत आहेत, त्यावर त्यांचा अभ्यासही चालू आहे, त्याच्या या प्रयत्नांना हातभार लागावा म्हणून आम्ही ई-बुक साप्ताहिक स्वरुपात त्यांचे साहित्य आपल्यासाठी घेऊन आलो आहोत.. आपल्याला आवडतील अशा प्रकारच्या दर्जेदार काव्यरचना वाचायला मिळतील, याची खात्री आम्ही देतो...

कवी/कवयित्री यांनी ज्या काव्यरचना आम्हाला पाठविण्यात आल्या आहेत त्या त्यांनी स्वतः लिहिलेल्या आहेत, जर कोणाला काव्यरचनेवर आक्षेप असेल तर, त्यांनी bhargavidesign@gmail.com वर आम्हला सूचित करावे..

धन्यवाद,
भार्गवी डिजाईन स्टुडिओ



कवी



# या सांजवेळी

या सांजवेळी आभाळ,
यावं मनात भरुन..
तुझ्या रेशमी मिठीत,
जावं आयुष्य विरुन..

निळ्या डोळ्यांत सागरी,
नौका प्रेमाची बुडावी..
तुझ्या पदरा सोबत,
स्वप्नं पाखरे उडावी..

वाटे ओठांनी टिपावा,
या ओठांचा गुलकंद..
स्पर्श बहरुन यावा,
या सांजवेळी धुंद..

सये अशा सांजवेळी,
नाही कुणी आसपास..
मिलनास उतावीळ,
तुझे माझे उष्ण श्वास..

शांत वादळ होईल,
मनी पहाटेची लाली..
सांजवेळ आठवता,
गालावर यावी लाली..

प्रसादिक




श्री. प्रसाद सुभाष धुमाळ
वाई, जि. सातारा




काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



# या सांजवेळी

सांज वेळी तुझी
वाट मी पाहतो
अधीर झाले मन
तुला मी शोधतो

तुझ्या सवे मी सखे
माळरानावरी रचिले
किती आशेचे उंच मनोरे
सुंदर स्वप्न मनी पहिले

सांजवेळी सूर्यास्त
अनेकदा आपण पहिला
आपल्या अनेक वचनांचा
साक्षीदार तो राहिला

रंगा रंगाच्या विविध
छटा,गडे पडती किती
तुझ्या गालावरी,पाहण्यास
किरणे सारी आतुरती

सांजवेळी खग सारे
विहरती,आपल्या घरी
सारे परतती,काळोखाचे
राज्य हळू हळू पसरे भूवरी



**श्री. संजय विष्णु जाधव**
शहापूर,जिल्हा - ठाणे



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



# या सांजवेळी

या सांजवेळी मन व्याकूळते
आठवणीत किती धुंदावते,
साऱ्या त्या क्षणांना स्पर्शूनी
ओढ अशी बेभान लावते....

सांजवेळचा परीसस्पर्श तो
अंतरंगाचे जणू सोने करतो,
तुझ्या-माझ्या नात्यात असा
अर्थ नव्याने भरून जातो...

मनी तरंग बदलत जाऊनी
कधी हर्ष,कधी उदासी भरते,
ही वेळ अशी अकल्पित की
मनावरी जादू करूनी जाते...

ओढ प्रियाच्या भेटीची मग
सहज मन मोहरूनी टाकते,
मनचक्षूंना साज स्मृतींचा
उदास तरी हवीशी वाटते...

एकांत किती जीवघेणा तरी
स्मृतीकल्लोळ खुणावतो,
या सांजवेळी नकळत मनी
भास वेडा स्पर्शून जातो....



**सौ. जया विनायक घुगे-मुंडे**
परळी वैजनाथ, बीड



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# सांजवेळ

होता सांजवेळ अचानक,
मनास करते बावरे....
हृदयी तुझीच साठवण,
आवरता नाही आवरे....

रंग प्रेमाचे आपुले,
द्विमन एक होते....
बोल माझ्या अंतरीचे,
आपोआप ओठी येते....

प्रेम नाजूक भावना,
अलगद अशी उमलते....
हृदय हृदयासी भेटता,
अवचित सारे घडते....

कसे जुळतात भाव,
नाही कुणास कळले....
कळत नकळत सारे,
सूर प्रीतीचे जुळले....

रंग प्रेमाचे गडद,
ओढ भेटीचे लावते....
प्रेम फुलता दोघांत,
लाली गालावर येते....

सांजवेळ होताच मनास,
लागते सदा हूरहूर....
होताच प्रेमाची आठवण,
घालते मनात काहूर....


कवयित्री



**सौ. वैभवी मराठे**

बोईसर, जिल्हा पालघर






कवी



# सांजवेळी

सांजवेळी डोळ्यातील थेंब सांडले काही,
मागुन ही देवास तु माझ्या नशिबात नाही !!

अश्रू माझे पाझरले, दुःख तुझे आवरुन,
जातांना का नाही गेली,काळजाचे तुकडे सावरुन !!

ओल्या पापणी वर जणू पालवी फुलावी,
कवितेची पहिली ओळ, तुझ्या नावाने लिहावी !!

वाळुवर लिहलेलं नावं, लाटांनी टाकलं पुसुन ,
सागराच पाणी आटता, जसं किनाऱ्याने बसावं रुसून !!

रात्री छळतात आठवणी,येती कंठ दाटूनी,
वाऱ्यालाही मिठी मारतो,जो येतो तुला स्पर्शुनी !!

प्रेमाच्या क्षणांचा मांडला तु खेळ,
त्यातुनच लागले मला लिखाणचे वेड !!

आठवणींच्या जत्रेतुन पुन्हा स्वप्न विकत घेतली,
अन् तुझ्यासाठी ही कविता,आज सांजवेळी सुचली !!



श्री. राजीव देशमुख
मु.पो.अकोला, जिल्हा अकोला





# सांजवेळ

कवी



सांजवेळ होता सये
येते तुझी आठवण
अन् मनात दुःखाची;
उगा होते साठवण ।। 1।।

नकळत डोळ्यातून
आसवांचे ओघळणे
तव आठवांचे माझ्या;
वेड्या मनास जाळणे ।। 2।।

अशी कशी सांजवेळ
वाटे मजला उदास
होतो सखे तुझा येथे;
क्षणोक्षणी मज भास ।। 3।।

नको दुरावा ठेवूस
नको राहूस अबोल
तव विरहात माझ्या;
दुःख मनातील खोल ।। 4।।

पुन्हा होवू सांजवेळी
चल सये एकसंग
पुन्हा नव्याने गावया;
प्रेम प्रीतीचा अभंग ।।5।।

✒ शिवकुमार



**श्री. विशाल एस. नवले**
रा.नांदुरा जि. बुलढाणा



# सांजवेळ

आतुरता नजरेची
सांजवेळ ही सुरंगी
आठवणी चे मोहळ
लहरते अंतरंगी.....

विसरते मनी मीच
सप्तरंगी मिसळते
पश्चिमा मिलना रवी
निशा ती हूरहूरते...

सांजवेळ सावळी ही
प्रिय सख्या सय येई
विरह वेदना उरी
ही ठसठसते बाई...

कधी लपंडाव चाले
रंगीत ह्या सावल्याचा
केशर उधळीत ही
प्रित अबोल ही वाचा...

स्वर्ग सुख रे लाभते
तुझा ऐकता सुस्वर
तोच स्वर जाणवतो
कानी आजही कातर...

सांजवेळ ही  रंगता
पडे ती  मनमोहिनी
संध्या संगे दिनकर
लुब्ध होई ग रोहिणी...

कवयित्री





सौ. रोहिणी टाकळकर जोशी



काव्य वृंदावन ई-बुक साहित्य

# सांजवेळ

कवयित्री



दिवसाचे प्रहर असतात चार
या सांजवेळी अश्रूंची दाटी फार
वर्षामागुन वर्ष सरली
आईच्या मायेविना वाढली
आठवणीचे काहूर माजले फार
सांजवेळी अश्रूंची दाटी फार !!
आईच्या भेटीची ओढ मुलीला
मुलीच्या भेटीची आस नव्हती आईला
कष्ट प्रद जीवन होते फार
सांजवेळी अश्रूंची दाटी फार!!
संसार रथाचे चाक निखलले
आधराविना जगणे कळले
नात्यांनी ही छळले फार
सांजवेळी अश्रूंची दाटी फार!!
संसाराची नविन स्वप्ने पहिली
घरून कुणाची साथ ना मिळाली
मनाची घुसमट झाली अपार
सांजवेळी अश्रूंची दाटी फार!!
माझीच कविता मी लिहली
स्वप्नातून जागी होताच अदृश्य झाली!!

**सौ. श्रद्धा शि खानापूरकर**
ठाणे



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# एक सांज

कवी



शीतल शीतल
अमृत धारा,
किरणे घेऊन
आला वारा,

हवी हवीशी
सांज मना,
क्षितिजा वरची
आहे कुना,

मंद मंद ही
चाहूल देते,
त्या चंद्राला
खुनवते बघा,

अशीच एक सांज
मनात असते,
व्याकुळतेला
आश्वासन देते,

लहरी पनाची
लहरी प्रीती,
अव्यक्त मनाची
ही नीती,

सांज वेळही
अशीच काही,
सतत मनाला
खुनवत राही,



**मयूर बागुल**
उमराने, नाशिक



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



# सांजवेळ

रे कृष्णसख्या येशील ना तू  या सांज वेळी
राधा मी तुझी व्याकुळ रे या कातरवेळी

पक्षी ही परतले घराकडे आनंदली घरटी
सावली ही गेली सोडून मला मी इथे एकटी

देण्यास साथ रजनीला बहरेल रातराणी
आठवणीने तुझ्या दाटले रे नयनी पाणी

तारकां सोबत गगनात विहरतो बघ शशी
चांदणे ही जाळते मजला सांगू तुला कशी

राहून असा दूर देशी  नको देऊ मज वनवास
परतुन ये सत्वरी  लागली तव भेटीची  आस



सौ. मनाली प्रदीप कोनकर
पोस्ट पेण, जिल्हा रायगड



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



# सांजवेळ (गजल)

वृत्त आनंदकंद
लगावली  गा गा ल गा  लगागा  गागलगा लगागा

आकाश रुक्ष झाले पाठून वार झाला
माझाच फोल गेला हा श्वास वाटणारा

का आज आपल्यांनी शब्दास धार केला?
माझ्याच काळजाला दुःखात तारणारा

आताच सांजवेळी पाऊस दाटलेला
माझ्याच भोवताली दुष्काळ थाटणारा

अस्तास सूर्य जाई हा खेळ भारलेला
अंती असाच राहे अंधार दाटणारा

प्रारब्ध जीवनाचा आधार ठरलेला
निस्तेज भावनेला माळून  टाकणारा



सौ. वर्षा फटकाळे वराडे
ठाणे



कवयित्री



# सांजवेळ

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
मनी कशी मज वेडावते ही
वेड्या मनाला साद घालते ही
तुझ्या वाचुन मज करमेना ही

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
आठवण मज आजही स्मरते ही
मागे ओळून पाहते मी तुलाच रे
आठवण येते तुझी मलाच रे

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
तुझ्या येण्याने खुलते कळी ही
साताजन्माची वेडी प्रीत ही
खोट्या आशेवर जगणारी रीत ही

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
हृदयातील जागा तुलाच देते मी ही
सोडून देशील ना आता हा त्रागा
वेडी सखी वाट पाहते रे तुझी

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
आता गोठले नयनातील अश्रू ही
घालमेल समजून घे माझी ही
वेडी प्रीत कधीकाळी मंदावते ही

सांजवेळ ही , अबोल प्रीत ही
क्षणोक्षणी तुझ्या आठवणीत झुरते रे ही
काळोख्या अंधारात तुला शोधते रे ही
वेडावली असेल अबोल प्रीत तुझी ही




**भाग्या पांडुरंग कारंडे लक्ष्मी (भाग्यलेखा)**
सोलापूर





काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# सांजवेळी मी अधीर

कवयित्री



क्षितीजावर केशर
छटा ही पसरली
सांजवेळ होण्याची
चाहूल मज लागली

झुळूक शीतल वाऱ्याची
मन माझे हेलावते
प्रेममय या सांजवेळी
तूझेच गीत गाते

आठवणीत तूझीया
मन माझे झुरते
सांजवेळी नजर
उंबरठ्यावर घुटमळते

पाखरे परतली घरट्यात
सूर्य ही गेला अस्ता
सया सांजवेळी भेटीची
जीवा लागली आस

शंकांचे उठते काहूर
काळजी तुझी सतावते
सांजवेळी दिपज्योतीस
साथ तुझी मागते

सांगना सख्या तू
साथ मज देशील ना?
सांजवेळी मी अधीर
लवकर तू येशील ना?


**सौ. सारिका सुहास वाणी (सारुमन)**
घणसोली, नवी मुंबई




# वाट पहाते !

कवयित्री



सांध्य घनातून झिरपत आली संध्येची चांदणी
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी //धृ//

नतद्रष्ट हा पाऊस सख्या,मनात भीती बसली
उरी माझिया खोल रुतली रे ही मेघांची भिजली
विसावली पाखरे घरट्यांमध्ये जाई जुई ही अंगणी
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी//1//

नको लावू मज वाट पहाया मन झाले घायाळ
विरहिणी मी तडपते, झाले काळेभोर आभाळ
झाल्या तिन्हीं सांजा आता ,बघ सूर्य गेला मावळूनी
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी //2//

विलग होऊनी रिमझिम धारा पागोळ्या अंगणी
सांजवेळ ही टळून गेली उगवली ती चांदणी
चिंतातूर मन सख्या जाहले, झाली दिवे लागती
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी //3//

अंत नको पाहू आता साद घालते हृदयातूनी
क्षितिजावरती होता सांज गेले रे मी हरखूनी
जीव कासावीस होतो रे ये लवकर परतूनी
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी //4//

"मन चिंती ते वैरी न चिंती रे" अशी स्थिती जाहली
जसा असशील तसा ये ना मनात शंका उठली
आलास नाही अजूनही तू घरा लागली झुरणी
वाट पहाते सख्या तुझी मी तुझीच सखी साजणी //5//



**सौ. सरोज सुरेश गाजरे**
भाईंदर



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# प्रेमवेडी सांज

कवी



दुपार नंतर सूर्य कसा
लालबुंद होऊ लागला,
निसर्गाशी मैत्री करून
तो पुन्हा प्रेमात पडू लागला..

दोर वाऱ्याचा घेऊन
वृक्ष मंद झुलू लागले,
केसात पक्षांना घेऊन
सांजेला विंचरू लागले..

माझ्या डोळ्यात पाहून
सांज लाली लावू लागली,
कौतुक स्वतःचे करायला
शब्दांना बोलवू लागली..

सांज सांजेत उगवून
सांजेला नटवू लागली,
डोंगर गालावर घेऊन
मानवाला लाजवू लागली..

आम्हावरी प्रेम तिचे
परतण्यास सांगू लागली,
काळोखातील आमुचे रक्षण
ती काजव्यांकडे मागू लागली..

मी परतत असताना घरी
ती माझ्याकडे बघू लागली,
शब्द फेकून माझ्या मनात
ती लेखणीला सुचवू लागली..



**सिद्धेश राजाराम पाटील**

कोल्हापूर



# सांजवेळ

कवयित्री



सांजवेळ झाली आता
दिशा बघ मवळली
आठवण येते तुझी
आशा मनी उगवली

विरहात सख्या जाती
आले दिवसं निघून
शिणलेत डोळे माझे
वाट तुझी रे पाहून

जग म्हणे हीचा पती
गेला वेडीला त्यागून
समाजात कशी राहू
गेला नाहीस सांगून

वाट पाहण्यात गेले
अर्धे आयुष्य विषारी
तुझ्या प्रेमाची लागली
माझ्या जिवाला बिमारी

लवकर यावे राया
सूर्य सांजेला रे आला
माझा आशेचा किरण
नाही अजून उगला



**सौ. रेणुका पांचाळ**
तालुका वसमत, जिल्हा हिंगोली





# सांजवेळी

कवयित्री



निळ्या निळाई अंबरी
सांजवेळी रक्तलालीमा दिसे
मावळतीचा भास्कर क्षितीज
भेटीस आसुसलेला असे//1//

मदहोश स्पर्श करी
अल्लड नाठाळ वारा
सांजवेळी बेधुंद होई
चराचर व आसमंत सारा//2//

स्वर्ण सोनकिरणे धरेस
अलवार मारी मिठी
धराही अधीर होई
सोनकिरणांच्या भेटीसाठी//3//

घरट्याकडे जाण्यास
पक्षीही घाली साद
मुक्त विहंगपणे चाले
पवना सोबत संवाद//4//

सागर अलिंगनास
सरीता खळखळ वाही
सागरही उसळून लाटा
भेटीसाठी अधीर राही//5//

दिवसभर थकलेल्या देहास
सांजवळेची लागे चाहूल
नात्यांची वीण घट्ट करणेस
घराकडे वळे पाऊल//6//

**सौ. मनिषा दिपक सामनेरकर**
पालघर



कवयित्री




# सांजवेळ

उधळले रंग सोनेरी
या मोहक सांजवेळी
आठवणीने तुझ्या रे
मनही झाले सोनेरी.....

रम्य या सायंकाळी
परततोय पक्षांचा थवा
वाट पाहते सख्या तुझी
घोर लागलीय जिवा.......

गुरे आली दावणीला
वासरांनीही हंबरडा फोडला
सजले घर, सजली मी
भरला व्याकुळतेचा घडा.....

नकोस घेऊ प्राण आता
विरहाची ही परिसीमा
ये रे सख्या लवकर
आतूर ही प्रियतमा.....

कलला आदित्य, वाऱ्याचा निनाद
सख्या, संपव आता ही कारतवेळ
अविनाशी प्रेमाला सामावयास
अंजलीने घातलाय मेळ.....

गितांजलीज् पोएट्री




**सौ. अंजली उत्तरवार**

चंद्रपूर




# ओढ

कवयित्री



क्षितिजावरील लाली आज ओठी सामावली
सांजवेळ ही होता चाहूल तुझी लागली

गर्द निळ्या काळोखात काया हासून भिजली
श्रृंगार पाहुनी दर्पणात स्वतःच लाजू लागली

वाटेवरी रायाच्या ह्रदय सुमने सजवली
गंध कळ्यांचा आज लावण्या मागू लागली

आठवणीत स्वारीच्या मन पाखरे हरवली
पाठी कुंतलाचा भार कशी सावरू लागली

साजणाच्या ओढीने चांदणी ठेक्यात मिरवली
नकोच जाच त्याचा चंद्रास झाकू लागली



**सौ.अर्चना सुनिल घळके**
बार्शी, सोलापूर



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



# काहूर

सांजवेळी क्षितिजावर भेट
धरणी अंबराची होते
कल्पनेत तुझ्या प्रेमाच्या
तेव्हा मी चिंब भिजून जाते ||1||

कधी वाटते पुन्हा एकदा
मी पाखरांपरि  स्वैर व्हावे
बंध तोडून हे रेशमाचे
गगनी उंच उंच उडावे ||2||

सांजवेळी जशी पाखरं
घरट्याकडे परतू लागली
मागे टाकलेल्या प्रेमाची
ओढ हळूच मनी जागली ||3||

सांजवेळी मनात  विचारांचे
असे काहूर का माजते
कानात कधी सनई चौघडे
तर कधी तुतारी वाजते ||4||



सौ. दिपाली दिलीप पिंपळे
ता.जि.पालघर

# सोनेरी सांज

कवयित्री



गगनी सुर्य आला मावळतीला
ती झुळूक मोहक सांजवेळी
अबोल असले तरी मनातले
गुपित इथे जिथे लपडांव खेळी ..1

सुर्यास्त सांजवेळी निसर्गात
लाल,केशरी,निळे,जांभळी
रंगछटा पसरी नभात छान
मेघांना मोहनी घाली सगळी..2

सांजवेळी कल्पवृक्ष काळेभोर
मावळतीला नभात रंगे सृष्टी
देखावा सुरेख सागराचे पाणी
हिंरे-मोती चमके पडे यावर दृष्टी..3

निरभ्र नभ साक्षीला मोही
धरणीवरील पशु पक्षीना
चाहूल ओढ लागे घराची
सुखावी नयनी हर्ष सर्वांना ...4

अंधार चोहबाजू हळू हळु पसरे
झाडेवेली शांत ,मंद वाही वारा
कातर सांजवेळ होते हळूच चंद्र
दिसू लागे शितल प्रकाश वाहे झरा..5



सौ. संगीता महाजन
जळगाव



# सांजवेळ

कवी



सूर्य आता मावळतीला लागला
क्षितीजावरती चौफेर गुलाल उधळला
तरूवेलींच्या माथ्यावरती पहा
किरणांचा सोनेरी पसरला शेला॥1॥

सांजवेळ झाली गुरे परतुनी येती
निळ्या नभांगणी पक्षी विहार करती
अवखळ वाहतो वारा पाने सळसळ करती
एकटाच वाटसरु झपझप पावले टाकती॥2॥

दिवे लागणी झाली प्रकाश मंद तेवला
पारावरच्या गप्पांना भलताच रंग आला
दिसभरल्या कामाचा शिण उतरुनी गेला
डोईवरच्या पागोट्याचा झुलतो हा शेला॥3॥

खडखड करती गाडी झाला फार वेळ
बैलं दिसती हरणावाणी गळ्यात घुंगुर माळ
दूरवरच्या माळावरती ऐकू येते शिळ
पसरली निरव शांतता हीच सांजवेळ॥4 ॥




**श्री सुरेश डवरी**

मु पो कातारळे, ता राधानगरी, जि कोल्हापूर




# ओली सांजवेळ

कवी



जीवघेणा प्रहर तूझ्या आठवांचा
उगा भास होई तूझ्या पाऊलांचा
वाऱ्यासवे झूलताना साउल्या
हा क्षण प्रीतीचा ओल्या सांजेचा......||

व्याकुळ भेटीची ओली सांजवेळ
घेऊन आली निरोप पाखरांचा....
बुडता डोहात किनारा क्षितिजाचा
हा क्षण प्रीतीचा ओल्या सांजेचा.......||

ओसरला कवडसा उन्हाचा
झुळूक वाऱ्याची स्पर्शून जाताना
आठवणीचं पिंपळपान गळताना
हा क्षण प्रीतीचा ओल्या सांजेचा....||

उसळून भावना सागर संथ लाटेचा
आभास पैंजनाचा दोष अंधुक वाटेचा
टेकता नभ सागरात जुळतो योग भेटीचा
हा क्षण प्रीतीचा ओल्या सांजेचा......||

आस भेटीची लावणारी कातरवेळ
बुडतो सूर्य फसव्या क्षितिजाचा
एकांती किनारी पडतो अंधार तरी
हा क्षण प्रीतीचा ओल्या सांजेचा......||



कु प्रशांत अशोकराव गोरे
राहुरी, अहमदनगर



# सांजवेळ


कवी

झेलतो मी रोज रोजच नवे कष्ट
दाटून येतं मन प्रेम भावही होतो नष्ट
समजत नाही मला कुणाला सांगू ही गोष्ट
त्या सांजवेळी अश्रुंचे वहायला होतं धारिष्ट

तुज्या वियोगाने मनही उदास होतं
वाऱ्याची हलकीच झुळूक तुझं असणं सांगून जातं
व्याकुलतेने मन मात्र तुज्याकडेच ओढलं जातं
त्या सांजवेळी जणू ते तुझीच महती गातं

आठवणीत तुज्या मन मात्र न्हाऊन निघतं
तुज्या तसबिरीकडे पाहताच हळूच तोंडावर हसू दाटलं
दिवसा मात्र सर्वत्र फिरताना काहीच वाटत नसतं
सांजवेळी मात्र तुज्या नसण्यानं एकटं एकटं वाटतं

तू असल्यावर संध्याकाळ मात्र बहरून जाते
मन प्रफुल्लित होऊन हसत खेळत बागडते
असे हे खेळ नियमितच चालू असतात
त्या सांजवेळी मात्र मनाचे वेगवेगळे प्रकार दिसतात.



स्वप्नील वालम

# सोनेरी सांज

कवयित्री



होता तिन्ही सांजा
सख्या,नयन पाही वाट...
येणार साजन माझा
वाहिले आनंदाचे पाट।

दिवा लावून देवाजवळ
सुखाची करते मागणी....
साजवेळेची गंमत निराळी
मन गाते प्रितीची गाणी।

करुन श्रृंगार मी ही
नवरीसारखी आज नटली...
आठवणीत साजनाच्या
खुद्कन गालातच हसली।

सहवास हवा मजला रे
सख्या,तुझीया प्रेमाचा...
सांजवेळ होई हर्षदायी
गर्व मज तु जवळ असण्याचा।

साथसंगत अशीच राहो
तुझी न माझी सदोदीत
हवा मज तू हवास रे
सांजवेळी या आंनदीत।




अँड. सौ. वर्षा जाधव
कळमनुरी, हिंगोली.




# सांजवेळ

कवी



प्रकाशाला मावळून त्या शीतल चांदण्या कडे जाणारी
कधी अश्रू, कधी हास्य, कधी प्रेम तर कधी विरहात नेणारी
रममाण होऊनी स्वतःत सर्वांना सामावून घेणारी
मनातील भावनांना उफणून आणणारी सांजवेळ ही...

कधी दिवसाच्या दगदगितला थकवा क्षमावणारी,
सर्व दुःख भुलवून एक सुखद अनुभव देणारी,
एका क्षणा करिता जगाचा विसर पडणारी,
वाऱ्याच्या झुळका सहित हास्य चेहऱ्यावर आणणारी, सांजवेळ ही...

त्याला तिची वा तिला त्याची आठवण देणारी,
दोघांच्या दुरव्याला एका आठवणीने जोडणारी,
एक एक क्षण सोबत व्यतीत केलेला डोळ्या देखत आणणारी,
अन् त्या प्रेम वर्षावात दोघांना चिंब भिजणारी सांजवेळ ही...

भास्कर अन्  निशनाथ दोघांना एकत्र जोडणारी,
तप्त दीर्घ दिवसाला शीतल निषेकडे सोपवणारी
एका घटिकेत भावनांचा समतोल समजणारी
अन् दिवसातील कटू क्षणांना दूर सारणारी....सांजवेळ ही....



**श्री. प्रथमेश तायडे**
खारघर, नवीमुंबई.



कवी



# आठवण सांजवेळची

वाट तुझी बघता सूर्य मज
परतीच्या दिशेने जाताना दिसला
काढता तुझी आठवण
माझ्या कड़े खुदकन पाहून हसला

सांजवेळी कविता लिहिताना
सखे आठवण तुझी येते
आपल्या पहिल्या भेटिचा दिवस आठवता
माझ्याही डोळ्यात अश्रु वाहते

डोळ्यातुन वाहाणाऱ्या अश्रुला
उपमा मि कशाची ग देऊ
सांग सखे क्षितिजवरच्या सांजवेळी
तुला मिठित कसा मि घेऊ

क्षितिजवरच्या त्या भेटिची
गुलाब होऊनि वाट मि पाहिली
त्या पहिल्या भेटिची आठवण माझ्याकडे
शेवटी काटा बनूनच राहिली

निघुन गेलीस तू आता आयुष्यातुन
जगायला उरल्यात त्या आठवणी फक्त
तुलाही माहिती आहे त्या आठवणीचा
मीच होतो खरा भक्त

आपल्या सांजवेळच्या भेटिचे
ते दिवस पुन्हा जीवनात यावे
दुखः विसरुन सारे जगातले
मन माझे आंनदी आनंद व्हावे




**सिध्देश रेखा दिलीप उतेकर**

वावे तर्फे खेड जांभूळ वाडी





काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवयित्री



# सांजवेळ

सांजवेळी सख्या मजसवे येशील का,
थरथरल्या हातांचा आधार तू होशील का?
बावरल्या नजरांना विसावा तू देशील का,
ओठी मुक्या कळ्यांना गंधित तू करशील का?

झाकाळलेले मन माझे
प्रतिबिंब त्यात केवळ तुझे,
सांजवेळी प्रतिमा रेखून
व्यथा जाणून घेशील का?

अवखळ सरिता
थांबवी किनारा
तिचा बांध  सख्या होशील का?
सांजवेळी येशील का?

थाट सारा निसर्गाचा
तुझे नी माझे साठी,
साक्षीने या सर्वांच्या
जुळोत आपल्या गाठी...

खळी पडल्या गालांचा
प्रमोद पुन्हा लूटशील का?
धीर देण्या मजसी तू
सांजवेळी येशील का?



**सौ. सरिता वावदे**
नाशिक



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

कवी



# सांजवेळ

तू असेल मी असेल,
माझी कविता असेल.
ऐकवणारा मी ऐकणारी तू,
अन स्तब्ध ती सांजवेळ असेल..
शब्द गोड होतील आपसूक,
तू समोर मधुर मुग्ध..
कविता तुझ्या ह्रदयात उतरेल
सांजवेळेलाही होईल आनंद
डोळ्यात तुझ्या पाहत
वेळ माझी प्रीत जगेल..
अशीच सांजवेळ हवी सदैव
भाग्याला मी हेच मागेल..
हेच मागेल..



**श्री. सचिन राऊत**
कुर्डुवाडी , सोलापूर



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# सांजवेळी

सूर्य निघाला अस्ताला
हुरहुर कातरवेळी
गिळंकृत दिन झाला
दिवालागण सांजवेळी ॥1 ॥

पूजा, प्रार्थना, आरती,पठण
घंटानाद सुरु राऊळी
मावळतीला सांज झाली
देव्हाऱ्यात मुर्ती सावळी ॥2॥

धेनु परतल्या घरी
हंबरती गोठ्याजवळी
वासराला बिलगता
चेकाळती पोरावळी ॥3॥

सांज भरली आभा रंगे
स्वागतास सायंकाळी
चंद्र चांदण्या चमचम
अवरतील रात्रीच्या भाळी ॥4॥

ग्रह ,तारका ,तारे सोबत
सजविती धुंद रात्र काळी
सांज विलोभनीय होई
स्वप्न अंतरीचे देई हाळी ॥5॥

दिस सरला आनंदात
समाधानी खुलते कळी
सांज दुवा दिन-रातीचा
चांदण्यांची नभी खळी ॥6॥

कवयित्री






सौ.शामला पंडित (दीक्षित)
प्रणाली प्रकाशन , चिंचवड




कवी



# सांजवेळ

पापन्यातुन विदारलेले अश्रु
चष्म्यांनी कधी लपत नसतात
मेघातून कोसळलेल पाणी
देखील सहज थांबत नसतं

विदारक स्वप्नामागे धाऊन
आयुष्य हरवून बसलोय मी
त्या एका सांजवेळी रात्रीमुळे
मी कायमच भटकत राहीलो

ज्या वाटेवर तु सोडून गेलीस
त्या वाटेने चालन अशक्य होत
पण ज्या वाटेने मी गेलो आहे
त्या वाटेत तु भेटलीस नाही

तुला आपले परके वाटले
आणि परके आपले वाटले
कळलेच नाही कसे आपण
अचानक विभक्त होत गेलो

पण एक मात्र नक्की सांगतो
जरीही माझी वाट वेगळी असली
तरीही मी मात्र शेवटी एक दिवस
तुझा होऊन नक्की जगुन दाखवेन





जयेश अजित उगले
ता-दिडोंरी, जि-नाशिक



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# सांजवेळ

कवयित्री



गंध सांजवेळी चा हा आगळा
मन भुलवी माझे रममाण तुझ्यात
नको कान्हा रुष्ट होऊ जरा थांब
लाविते सांजवात पाहते तुज माझ्यात...1

प्रेमगंध ज्योती सम प्रखर
रुप तुझे निर्गुण-निराकार
मार्गस्थ मी भक्ती वाटेवर
तुझी साथ हवी निरंकार...2

सांजवेळी सूर्यास्तानंतर
प्रकाश मावळतो नभावरी
तरी ज्योत  मिणमिणती
दिसे फक्त तुझ्या मनावरी...3

एकरूप झाले अशी तुझ्यात
नाही कळले का तुजं श्रीरंग
आता नको लाऊ वेळ असा
चारी दिशा पसरले चहूरंग...4

ह्रदयात मन माझे तुझेच आहे
दिव्य द्दष्टीने तू बघत आहे
नाही मज या वस्त्राची चाड
फक्त तुझ्या मनात रमत आहे...5

सौ.सोनाली जगताप
मुंबई (बांद्रा)





# सांजवेळ

कवी



सांजवेळ झाली आता
लावा तुळशीपुढे दिवा
जुना भारतीय संस्कार
आपण जोपासायला हवा

गाई परतती घरोघर
प्रेमाने पाहती वासराकडे
सांजवेळ त्यांच्या भेटीची
ओढ लागते घराकडे

आठवण होते जुनी
जेव्हा असे सांजवेळ
मारुतीच्या मंदिरात
चाले लपाछपीचा खेळ

भजन,कीर्तनात दंग
होत होते गावकरी
देहभान हरपून जाई
आयुष्याची मजा न्यारी

विरह होणार रवि तुझा
वाट पाहू रे सकाळची
फटफटते सकाळी अन्
घाई होती खूप कामाची



श्री. अरविंद कुळकर्णी
मलकापूर



कवी



# सांजवेळ

रेशमी ही सांजवेळ,
नाजूक तुझा स्पर्श..
ये ना मिठीत आता,
लाभेल मनाला हर्ष..

मोहक असे रूप तुझे,
प्रतिबिंब जणू प्रेमाचे..
शब्दांत कसे सांगू सखे
सौंदर्य गोजीरे तुझे..

किती निरागस वेडेपणा,
त्यात जीवघेणी नटखटता
निःशब्द झाली सांजवळ,
भेट तुझी माझी होता...

प्रेम शब्दातून सांगतो,
सांजवेळेस साक्षी ठेवून..
जाणारे क्षण थांबावे,
तुला मला असं बघुन..





योगेश देवरे
देवळाणा, जि औरंगाबाद (संभाजीनगर)



काव्य वृंदावन
ई-बुक साहित्य

# 9130593593

bhargavidesign@gmail.com




## OUR SERVICES

### CORPORATE IDENTITY

Logo, Business Card, Letterhead,
Envelops, CD Cover Design, etc.

### OUTDOOR & INDOOR BRANDING

Hoarding, Backdrops, Internal Panels, Posters
Magazine & Newspaper Add, Exhibition Stall Design
3D Prespectives.

### PRINT COLLATERALS

Brochure, Catalogues, Newsletter, Leaflet, etc.

### MULTIMEDIA

3D Logo, Corporate Presentation.

### SPECIAL SERVICE

Wedding Album Design, Photo Editing.

